**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) मृद आरोग्य पत्रिका योजना सन २०२०-२१ मध्ये राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: योजना ३३२०/प्र.क्र. ७१/१अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मंत्रालय विस्तार,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०७ ऑगस्ट, २०२०.

**वाचा :-**

१. केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत मृद आरोग्य पत्रिका योजनेच्या मार्गदर्शक सुचना.

२. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र. वानियो २०१५/ प्र.क्र. ५५/ भाग-१/१५/२ ओ, दि. १८ मे, २०१६.

३. कृषि व पुदम विभाग, शासन निर्णय क्रमांक :- मृदस -१४१८/ प्र.क्र.२२०/१७अे, दिनांक २४ ऑगस्ट,२०१८.

४. कृषि व पुदम विभाग, शासन निर्णय क्रमांक :- मृदस -१४१८/ प्र.क्र.२२५/१७अे, दिनांक २७ ऑगस्ट,२०१८.

५. कृषि व पुदम विभाग, शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २७१९/ प्र.क्र.४३/ १ अे, दिनांक २४ जुलै, २०१९.

६. केंद्र शासनाचे पत्र क्र.१६-२/२०१५ Fert Use, दि.२६ सप्टेंबर २०१९ चे पत्र

७. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक :योजना ३३१९/प्र.क्र.५१/१ अे, दि. ०९ जानेवारी २०२०

८. केंद्र शासनाचे क्र. २-२/२०१८- Fert Use(Pt), दि .१७ एप्रिल, २०२० चे पत्र.

९. केंद्र शासनाचे क्र. २-२/२०१८- Fert Use(Pt) दि. १० जून, २०२० चे पत्र.

१०. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र.कृआ/मृसमृचा/जआप २०२०-२१/१६५२२/२०२०. दिनांक १५ जुलै २०२०.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत मृद आरोग्य पत्रिका वितरण कार्यक्रम सन २०१५-१६ पासून केंद्र व राज्य हिस्सा ६०:४० या प्रमाणात राबविण्यात येत आहे. राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत जमीन आरोग्य पत्रिका योजनेंतर्गत सन २०१९-२० मध्ये जमीन आरोग्य पत्रिका पथदर्शी प्रकल्पाच्या माध्यमातुन राज्यातील ३५१ तालुक्यांतून प्रत्येकी एका गावाची निवड करण्यात येऊन त्या गावातील सर्व शेतकऱ्यांना मृद आरोग्य पत्रिका देणे, प्रात्यक्षिके व शेतकरी मेळावे आयोजित करणे इ. बाबींच्या अंमलबजावणीसाठी महत्वकांक्षी योजना राबविण्यात येत होती. केंद्र शासनाने कार्यकारी समितीच्या दि. ०३.०६.२०२० च्या सभेत सन २०२०-

२१ मध्ये महाराष्ट्र राज्याकरीता प्रति तालुका १० गावे याप्रमाणे ३४ जिल्ह्यांतील ३५१ तालुक्यांतील एकुण ३५१० गावांमध्ये सदर योजना राबविण्याबाबत कळविलेले आहे.

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) जमिन आरोग्य पत्रिका योजना सन २०२०-२१ मध्ये राबविण्याकरिता केंद्र शासनाने संदर्भ क्र. ०८ वरील दि. १७ एप्रिल २०२० रोजीच्या पत्रान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. तसेच, सन २०२०-२१ करिता एकूण रु. ९४८.७५ लाख इतक्या रकमेचा वार्षिक कृति आराखडा केंद्र शासनाच्या संदर्भ क्र. ०९ वरील दि. १० जुन २०२० रोजीच्या पत्रानुसार मंजूर करण्यात आलेला आहे. सदर योजनेंतर्गत केंद्र शासनाने कार्यकारी समितीच्या दि. ०३.०६.२०२० च्या सभेत महाराष्ट्र राज्याकरीता प्रति तालुका १० गावे याप्रमाणे ३४ जिल्ह्यांतील ३५१ तालुक्यांतील एकुण ३५१० गावांसाठी रू. ९४८.७५ लाख इतक्या रक्कमेचा वार्षिक कृती आराखडा मंजूर केलेला आहे. त्यास अनुसरून राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) जमिन आरोग्य पत्रिका योजना सन २०२०-२१ मध्ये केंद्र शासनाच्या कृती आराखड्यानुसार राबविण्याकरिता प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय:-</u>

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) जमिन आरोग्य पत्रिका योजना सन २०२०-२१ मध्ये राबविण्याकरिता प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर योजना प्रति तालुका १० गावे याप्रमाणे एकुण ३५१० गावांमध्ये राबविण्यासाठी केंद्र हिश्श्यापोटी रु.५६९.२५ लाख व राज्य हिश्श्यापोटी रु. ३७९.५० लाख अश्या एकूण रू. ९४८.७५ लाख इतक्या रक्कमेच्या खालील वार्षिक कृती आराखड्यास मान्यता देण्यात येत आहे.

**जमीन आरोग्य पत्रिका योजना सन २०२०-२१ मंजूर वार्षिक कृति आराखडा (रु.लाखात)**

| अ.क्र. | बाबींचे नाव | भैतिक (गावे संख्या) | आर्थिक | | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| | | | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | |
| १ | शेतकरी प्रशिक्षण | ३५१० | ५०५.४४ | ३३६.९६ | ८४२.४० |
| २ | जआप आधारीत प्रात्यक्षिके | ३५१० | ५२.६५ | ३५.१० | ८७.७५ |
| ३ | अभियान व्यवस्थापन (२%) | -- | ११.१६ | ७.४४ | १८.६० |
| | **एकूण** | | **५६९.२५** | **३७९.५०** | **९४८.७५** |

२. कोविड -१९ विषाणूच्या प्रादुर्भावाच्या पार्श्वभुमीवर सन २०२०-२१ मध्ये मृद नमुने काढणे, तपासणे व जआप वितरण ही बाब केंद्र शासनाच्या निर्देशानुसार स्थगीत केलेली असुन प्रति गाव १ प्रशिक्षण वर्ग (रू.२४०००/वर्ग) व १ हे.चे एक प्रात्यक्षिक (रू.२५००/हे.) याप्रमाणे केंद्र शासनाने कार्यक्रम अंमलबजावणीस दिलेल्या मान्यतेनुसार सदर योजना राज्यात राबविण्याकरिता मान्यता देण्यात येत आहे.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च चालू सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर केलेल्या अनुदातून भागविण्यात येऊन पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| केंद्र हिस्सा लेखाशिर्ष | राज्य हिस्सा लेखाशिर्ष |
|---|---|
| मागणी क्रमांक -डी-३<br>२४०२ मृद व जलसंधारण,<br>(००)(१०१), मृद सर्वेक्षण व चाचणी<br>(००)(१६) कृषि उन्नती योजना-मृद आरोग्य पत्रिका (केंद्र पुरस्कृत योजना)<br>केंद्र हिस्सा- ६०%<br>२४०२ ए ०४१ (सर्वसाधारण)(योजनांतर्गत)<br>३३ अर्थसहाय्य | मागणी क्रमांक -डी-३<br>२४०२ मृद व जलसंधारण,<br>(००)(१०१), मृद सर्वेक्षण व चाचणी<br>(००)(१७) कृषि उन्नती योजना-मृद आरोग्य पत्रिका (केंद्र पुरस्कृत योजना)<br>राज्य हिस्सा - ४०%<br>२४०२ ए ०५९ (सर्वसाधारण)(योजनांतर्गत)<br>३३ अर्थसहाय्य |

३. **सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.**

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवून सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत

३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चीत रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरूपात रकमा विचारात घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

५) कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. सदर योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व सहाय्यक संचालक, लेखा १ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रकियेचे/ वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत / P.W.D/मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार /CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/ नियम/परिपत्रक तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील. त्यांनी या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला सर्व निधी सर्व जिल्हयांना पीएफएमएस (PFMS) प्रणालीव्दारे वितरीत करण्याची कार्यपध्दती बंधनकारक राहील.

६.   प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग- पहिला, उपविभाग तीन मधील अनु क्र. ४ येथील नियम २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये काढण्यात येत आहेत. तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं -२०२०/ प्र.क्र.६५/अर्थ ३, दिनांक ०४.०५.२०२० व दिनांक २६.०५.२०२० मधील अटी व शर्तींची पुर्तता करण्यात यावी.

७.   सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००८०७१६१२५०४००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2020.08.07 16:24:33 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
४. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर .
८. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
११. सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.